**श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांना शासन सेवेतून निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः इएनक्यु-२०२१/प्र.क्र.५८३/पोल-२**
दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २९ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :-**

१) **पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.पोआ/कक्ष-५(३)/सुजाता पाटील/१४५/विचौ/२०२१, दि. १३ ऑक्टोबर, २०२१

२) **पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांकः** पोमसं/२-अ/२२/कसुरी-सुजाता पाटील/७३/२०२१, दि. २२ ऑक्टोबर, २०२१

**शासन आदेश :-**

ज्या अर्थी श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांच्याविरूध्द लाचलुचपत प्रतिबंधक अधिनियम, १९८८ मधील कलम ७ अन्वये लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई येथे गु.नों.क्र. ४१/२०२१ अन्वये गुन्हा दाखल केला आहे.

ज्याअर्थी श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांचेविरुध्द फौजदारी गुन्हयाबाबतचे प्रकरण अन्वेषनाधीन आहे,

त्याअर्थी आता महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम ४ च्या पोटनियम (एक) अन्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून याद्वारे उक्त श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांना या आदेशाच्या दिनांकापासून शासन सेवेतून निलंबित करण्यात येत आहे.

त्यानुसार असेही आदेश देण्यात येत आहेत की, निलंबनाच्या कालावधीत श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकलेल्या काळातील वेतन) नियम १९८१ मधील नियम ६८ (एक) (अ) नुसार निर्वाह भत्ता व त्यावरील अनुज्ञेय महागाई भत्ता देण्यात यावा.

शासन आणखी असेही आदेश देत आहेत की, जोपर्यंत निलंबनाचे आदेश अस्तित्वात असतील तोपर्यंत श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई यांचे मुख्यालय पोलीस आयुक्त कार्यालय, बृहन्मुंबई हे राहिल. श्रीमती सुजाता पाटील यांना पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडता येणार नाही. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या पूर्वपरवानगीशिवाय त्यांनी मुख्यालय सोडल्यास ती त्यांची गैरवर्तणूक ठरेल व त्या कारणासाठी वेगळ्या शिस्तभंगाच्या कारवाईस त्या पात्र ठरतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२९१८३४०७२५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2021.10.29 18:49:33 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्रीमती सुजाता आबासाहेब पाटील, सहायक पोलीस आयुक्त, मेघवाडी विभाग, मुंबई. (पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

३. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.

४. अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, वांद्रे (प), मुंबई.

५. अवर सचिव, पोल-१ (अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१०, मुंबई शहर

७. निवड नस्ती (कार्यासन पोल-२)